**पुराभिलेख संचालनालय, मुंबई यांचेमार्फत आयोजित करण्यात येणाऱ्या "अभिलेख व्यवस्थापन शास्त्र" या विषयावरील प्रशिक्षण कार्यशाळेच्या आयोजनास व प्रती प्रशिक्षण कार्यशाळेसाठी होणा-या खर्चास प्रशासकीय मान्यता देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- मपुवि-२०२४ /प्र.क्र.१०६/सां.का. २**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-३२.
दिनांक : २९ जूलै, २०२४

**वाचा :-** १. शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक विभाग,क्रमांक - मपुवि-२०१७/प्र.क्र.५९/सां.का.२ दि.१३.१२.२०२१.

२. संचालक, पुराभिलेख संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्रमांक जा.क्र. पुरा. संचा / संकलन /अव्यशा/२०२४/बी-१०६, दि.१२.०४.२०२४.

**प्रस्तावना :**

पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागाच्या अधिपत्याखालील पुराभिलेख संचालनालय कार्यालयास "अभिलेख व्यवस्थापन शास्त्र" या विषयावर प्रत्येक वित्तीय वर्षात प्रत्येक महसूली विभागात एक याप्रमाणे ६ प्रशिक्षण कार्यशाळा आयोजित करण्यास (विहीत अटींच्या अधीन राहून) उपरोक्त संदर्भ क्र. १ च्या शासन निर्णयान्वये कायम स्वरुपी मान्यता देण्यात आली होती. परंतू, आता ७ महसूली विभाग झाल्यामुळे (नागपूर, अमरावती, नाशिक, छत्रपती संभाजीनगर, पुणे, कोकण-१ व कोकण-०२) प्रत्येक महसूली विभागात १ याप्रमाणे एकूण ७ प्रशिक्षण कार्यशाळा आयोजित करण्यास व महसूली विभागनिहाय वाढती प्रशिक्षणार्थींची संख्या व वाढत्या महागाईमुळे प्रती प्रशिक्षण कार्यशाळेसाठी यापूर्वी मंजूर करण्यात आलेला रू.६०,०००/- इतका खर्च अपूरा पडत असल्याने, प्रती प्रशिक्षण वर्गासाठी होणाऱ्या रुपये ७५,०००/- (अक्षरी रुपये पंच्याहत्तर हजार फक्त) इतक्या अंदाजित खर्चास कायमस्वरूपी मान्यता देण्याची विनंती, संचालक, पुराभिलेख संचालनालय, मुंबई यांनी उपरोक्त संदर्भ क्र. २. च्या पत्रान्वये केली आहे. त्यानुसार सदरहू प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागाच्या अधिपत्याखालील पुराभिलेख संचालनालय कार्यालयास "अभिलेख व्यवस्थापन शास्त्र" या विषयावर प्रत्येक वित्तीय वर्षात प्रत्येक महसूली विभागात १ याप्रमाणे ७ प्रशिक्षण कार्यशाळा आयोजित करण्यास व प्रती प्रशिक्षण कार्यशाळेसाठी होणाऱ्या रुपये ७५,०००/- (अक्षरी रुपये पंच्याहत्तर हजार फक्त) इतक्या अंदाजित खर्चास सदर शासन निर्णयान्वये खालील अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१) प्रशिक्षण अभ्यासक्रमाची आखणी व त्यासाठी आवश्यक असलेले साहित्य शासकीय अधिनियम, नियम व कार्यपध्दतीनुसार असेल याची संचालकांनी खात्री करुन घ्यावी.

२) प्रशिक्षण अभ्यासक्रमासाठी प्रशिक्षकांची निवड करताना त्यांना अभिलेख व्यवस्थापनाबाबत शासकीय नियम कार्यपध्दतीची माहिती व अनुभव असल्याची संचालकांनी खात्री करुन घ्यावी.

३) संचालनालय सदर खर्च कार्यालयीन खर्चाच्या तरतूदीमधून करणार असल्याने त्यासाठी विहित वित्तीय व खरेदीविषयक नियमांचे पालन करण्यात यावे.

४) प्रस्तुत प्रशिक्षण कार्यशाळेनंतर संबंधित कार्यालयात त्याची प्रत्यक्ष अंमलबजावणी करण्याबाबत केलेल्या कार्यवाहीचा आढावा घ्यावा व या कार्यशाळेच्या फलश्रुतीचा अहवाल शासनास सादर करावा.

५) पुराभिलेख संचालनालयाने प्रत्येक महसूली विभागात प्रशिक्षण कार्यशाळा झाल्यानंतर त्याबाबतचा तपशील खालील तक्त्यात शासनास सादर करावा.

| अ.क्र. | वित्तीय वर्ष | महसूली विभाग | प्रशिक्षणाचे ठिकाण | प्रशिक्षण कार्यशाळेचा कालावधी | प्रशिक्षणार्थ्यांची संख्या | प्रशिक्षण कार्यशाळेसाठी झालेला प्रत्यक्ष खर्च (रु.) |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | |

०२. सदरचा खर्च "मागणी क्र. क्रमांक झेडडी-२, २२०५ कला व संस्कृती, १०४ पुराभिलेख (०१) (०२) पुराभिलेख कार्यालये (२२०५ १७९५) १३ कार्यालयीन खर्च" या लेखाशिर्षाखाली त्या त्या वित्तीय वर्षात उपलब्ध करण्यात आलेल्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा. प्रत्येक वित्तीय वर्षात सदर कार्यशाळेच्या अनुषंगाने आवश्यक अर्थसंकल्पिय तरतूद उपलब्ध करुन घेण्यात यावी.

०३. संचालक, पुराभिलेख संचालनालय,मुंबई यांना यासाठी नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून, त्यांना अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यास या संबधीच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

०४. सदर शासन निर्णय वित्त विभाग क्र. वि.अ.प/२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग दोन, दि. १७ एप्रिल, २०१५ वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८, भाग-एक, उप विभाग-तीन अ.क्र.४, परिच्छेद २७ (२) (अ) नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकाराच्या अधिन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

०५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२४०७२९११२३४३६१२३ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राने राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

NANDA MARUTI RAUT

Digitally signed by NANDA MARUTI RAUT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL DEPARTMENT, 2.5.4.20=281d8ee0076aee3a052a490903f93deadef9f7e2a186620ec03666d244838270, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BAF9D9317025580944685E047B9C52D64C532684054F19E1F02C374B78E1773F, cn=NANDA MARUTI RAUT
Date: 2024.07.29 15:10:10 +05'30'

**( नंदा मा. राऊत )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति:-**

१. मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव (सांस्कृतिक कार्य) यांचे स्वीय सहायक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.

३. महालेखापाल लेखा परीक्षा/ लेखा अनुज्ञेयता महाराष्ट्र-१, मुंबई.
४. संचालक, पुराभिलेख संचालनालय, मुंबई.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
७. अवर सचिव (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. निवडनस्ती, सां.का.२.